

# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## १९९) श्री शिवापराधक्षमापणस्तोत्रम् -१

आदौ कर्मप्रसङ्गात् कलयति कलुषं मातृकुक्षौ स्थितं मां विण्मूत्रामेध्यमध्ये क्कथयति नितरां जाठरो जातवेदाः ।
यद्यद् वै तत्र दुःखं व्यथयति नितरां शक्यते केन वक्तुं क्षन्तव्यो मे पराधः शिव शिव शिव भो श्रीमहादेव शम्भो ।।१।।

मानवी जीवनामध्ये कर्म अनिवार्य आहेत. कर्म करायचे म्हटले की त्यात दोष येणारच. काही ना काही चूक घडणारच. त्याच्या परिणामस्वरूप फळांपासून आणि सगळ्यात महत्त्वाचे म्हणजे पश्चात्तापापासून वाचायचे असेल तर क्षमायाचना अत्यंत महत्त्वाची कृती ठरते.

प्रस्तुत स्तोत्रात गतजन्मीच्या अयोग्य कृतींपासून आचार्य आरंभ करीत आहेत. ते म्हणतात,

आदौ कर्मप्रसङ्गात् कलयति कलुषं मातृकुक्षौ स्थितं मां- पूर्वीच्या जन्मात केलेल्या कर्मांचा फळा नुसार त्यातील वाईट कर्मांनी मला मातेच्या गर्भात आणून टाकले. विण्मूत्रामेध्यमध्ये क्कथयति नितरां जाठरो जातवेदाः -

तेथे रक्त, मांस,मलमूत्र या सगळ्या घाणीत मी पडलेलो होतो.

मातेच्या उदरातील जठराग्नी मला सतत जाळत होता.

यद्यद् वै तत्र दुःखं व्यथयति नितरां शक्यते केन वक्तुं- तेथे ज्या ज्या प्रकारची अत्यंत भयानक दुःखे आहेत त्यांचे पूर्णपणे कथन कोण करू शकेल ?

या सगळ्यातून सुटण्याचा मला एकच मार्ग दिसत आहे. हे भगवान शंकरा मी आपल्या चरणी शरण आलो आहे. आपणास प्रार्थना करीत आहे ,

क्षन्तव्यो मे पराधः शिव शिव शिव भो श्रीमहादेव शम्भो - श्री महादेव शंभो माझ्या अपराधांना क्षमा करा. आपण परमपवित्र आहात आपल्या चरणाशी मला पवित्र करा.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

**२००) श्री शिवापराधक्षमापणस्तोत्रम् -२**

बाल्ये दुःखातिरेको मललुलितवपुः स्तन्यपाने पिपासा
नो शक्तश्चेन्द्रियेभ्यो भवगुणजनिता जन्तवो मां तुदन्ति ।
नानारोगादिदुःखाद्रुदनपरवशः शङ्करं ना स्मरामि
क्षन्तव्यो मे पराधः शिव शिव शिव भो श्रीमहादेव शम्भो ।।२।।

पूर्वजन्मीच्या कर्मांच्या फलवशात गर्भवास प्राप्त झाला. आरंभीच्या श्लोकात त्याचे वर्णन केल्यानंतर आचार्यश्री पुढे म्हणतात की जन्म प्राप्त झाल्यानंतर देखील ही दुःख परंपरा सुटली नाही.

शैशवावस्थेतील दुःखांचा विचार मांडताना आचार्यश्री म्हणतात,

बाल्ये दुःखातिरेको - बालपणात मला अनेक दुःखदायक गोष्टींचा सामना करावा लागला. मललुलितवपुः- माझे शरीर मलाने व्याप्त होते. स्वतःचे मलमूत्र देखील स्वच्छ करता येत नव्हते. मी त्यातच लोळत होतो. आजूबाजूला इतर घाण असली तरी त्यातच लोळावे लागत होते. सरकण्याची देखील क्षमता नव्हती.

स्तन्यपाने पिपासा - सातत्याने स्तनपानाची तृष्णा जागृत होत होती. अर्थात तहान भुकेच्या वेदना त्रस्त करीत होत्या.

नो शक्तश्चेन्द्रियेभ्यो- शरीराच्या अवयवांची मध्ये कोणत्याच प्रकारची शक्ती नव्हती. सर्वच बाबतीत पराधीनतेचे दुःख होते. भवगुणजनिता

जन्तवो मां तुदन्ति - या संसारात जन्माला येणारे विविध जीव-जंतू मला तोडत होते. डास मुंग्या चावत होत्या. त्यांना हाकलण्याचीदेखील ताकद नव्हती.

नानारोगादिदुःखाद्रुदनपरवशः - नानाविध रोगांनी आणि दुःखांनी परवश झालेला मी केवळ रडत होतो.

शङ्करं ना स्मरामि- हे भगवान शंकराच्या वेळी मला आपले स्मरण देखील करता येत नव्हते.

क्षन्तव्यो मे पराधः शिव शिव शिव भो श्रीमहादेव शम्भो - हे भगवान महादेव शंभो शंकरा माझ्या अपराधांना क्षमा करा.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## २०१) श्री शिवापराधक्षमापणस्तोत्रम् -३

प्रौढोहं यौवनस्थौ विषयविषधरैः पञ्चभिर्मर्मसन्धौ दष्टो नष्टो विवेकः सुतधनयुवतिस्वादुसौख्ये निषण्णः ।

शैवीचिन्ताविहीनं मम हृदयमहो मानगर्वाधिरूढं क्षन्तव्यो मे पराधः शिव शिव शिव भो श्रीमहादेव शम्भो ।।३।।

मानवी जीवनातील दुःख परंपरेचे वर्णन करतांना आचार्य श्री म्हणतात की काळाच्या ओघात मी मोठा झालो. बालपणीच्या दुःख कारणांना दूर करण्याचे बळ तर अंगी आले पण तरी दुःख कुठे संपले? तारुण्यात वेगळे दुःख सुरू झाले.

प्रौढोहं यौवनस्थौ - मी थोडा मोठा झाल्यावर यौवन अवस्थेला प्राप्त झालो.

विषयविषधरैः पञ्चभिर्मर्मसन्धौ

दष्टो - त्यावेळी शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध या पाचही विषयरूपी विषधर म्हणजे सापांनी माझ्या मर्म स्थानांना चावा घेतला.

त्या पाच विषयांचा आस्वाद घेणारी अनुक्रमे कान,त्वचा, डोळे, जीभ आणि नासिका ही पाचही इंद्रिये त्याविषयांच्याच ताब्यात गेली होती. जणु त्यांच्या विषाने बेशुद्ध झाली होती.

नष्टो विवेकः - त्याचा परिणाम म्हणून माझा विवेक नष्ट झाला. काय करावे? आणि काय करू नये? हेच समजत नव्हते.
सुतधनयुवतिस्वादुसौख्ये निषण्णः - मुलगा, पैसा, पत्नी यांच्या गोड गोड वाटणाऱ्या सुखात मी आकंठ बुडून गेलो.

शैवीचिन्ताविहीनं - भगवान शंकरांचे चिंतन करण्याचे सोडून,

मम हृदयमहो मानगर्वाधिरूढं- माझे हृदय मानसन्मान गर्व यांच्या टोकावर आरूढ झाले होते.

हे सर्व माझे दोष आहेत.

क्षन्तव्यो मे पराधः शिव शिव शिव भो श्रीमहादेव शम्भो - हे भगवान महादेवा ! शिवशंकरा! माझ्या या अपराधांना क्षमा करा.

मला आपले चिंतन करण्याची बुद्धी प्रदान करा.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

**२०२) श्री शिवापराधक्षमापण स्तोत्रम् -४**

वार्द्धक्ये चेन्द्रियाणां विगतगतिमतिश्चाधिदैवादितापैः
पापै रोगैर्वियोगैस्त्वनवसितवपुः प्रौढिहीनं च दीनम् ।
मिथ्यामोहाभिलाषैर्भ्रमति मम मनो धूर्जटेर्ध्यानशून्यं क्षन्तव्यो मे पराधः शिव शिव शिव भो श्रीमहादेव शम्भो ।।४।।

बरे पुढे वय वाढत गेल्यानंतर तरी हे त्रास कमी झाले का? तर नाहीच. उलट त्यात वार्धक्यामुळे आलेल्या नवनवीन त्रासांनी भरच घातली.

कोणते त्रास?तर आचार्य श्री म्हणतात,

वार्द्धक्ये चेन्द्रियाणां विगतगति - म्हातारपणामुळे इंद्रियांची गती क्षीण झाली. आता त्यांना हालचाल करणेही कठीण झाले आहे.

मतिश्च- मती अर्थात स्मरणशक्तीची देखील तीच अवस्था आहे. काही वेळापूर्वी केलेले कार्यही आठवत नाही.

आधिदैवादितापैः - आध्यात्मिक आधिदैविक आणि आधिभौतिक अशा त्रिविध प्रकारच्या तापांनी,

पापै - आज वर जीवनात केलेल्या विविध पापांनी,

रोगैः- त्यांचा परिणाम होऊन झालेल्या विविध रोगांनी,

वियोगैः- उपयुक्तता कमी झाल्यामुळे नातलगांनी देखील तोंड फिरवल्यामुळे आलेल्या वियोगानी,

त्वनवसितवपुः- अस्थिर झालेल्या शरीरानी,

प्रौढिहीनं च दीनम् - माझी सगळी प्रौढी गळून गेली आहे. आता मी हीन-दीन अवस्थेला पोहचलो आहे.

मिथ्यामोहाभिलाषैर्भ्रमति मम मनो- मात्र अद्यापी माझे मन त्या खोट्या मोहांमध्ये,अभिलाषा मध्येच भ्रमण करीत आहे. धूर्जटेर्ध्यानशून्यं - ते मन भगवान शंकरांच्या ध्यानाने अजूनही शून्यच आहे.

भगवंताचे ध्यान करीत नाहीच आहे.

क्षन्तव्यो मे पराधः शिव शिव शिव भो श्रीमहादेव शम्भो - हे भगवान महादेव शंभो शंकरा माझे हे अपराध क्षमा करा.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## २०३) श्री शिवापराधक्षमापण स्तोत्रम् -५

स्नात्वा प्रत्यूषकाले स्नपनविधिविधौ नाहृतं गाङ्गतोयं पूजार्थं वा कदाचिद् बहुतरगहनात्खण्डबिल्वीदलानि ।

नानीता पद्ममाला सरसी विकसिता गन्धपुष्पै त्वदर्थं क्षन्तव्यो मे पराधः शिव शिव शिव भो श्रीमहादेव शम्भो ।।५।।

भगवान श्री भोलेनाथांची क्षमायाचना करतांना आज पर्यंत मी कोण कोणत्या गोष्टी केल्या नाहीत? याची एक सूची आचार्य देत आहेत. त्यातून खरेतर, वेगळ्या शब्दात आपण सगळ्यांनी भगवान शंकरांच्या उपासनेस्तव काय काय करायला पाहिजे? ही सांगण्याची आचार्यांची ही सुंदर पद्धती आहे.

आचार्यश्री म्हणतात,

स्नात्वा प्रत्यूषकाले स्नपनविधिविधौ नाहृतं गाङ्गतोयं

पूजार्थं वा - हे भगवंता मी कधीही प्रातःकाळी स्नान करून आपल्या अभिषेक विधी साठी किंवा पूजेसाठी कधी गंगेचे जल आणले नाही

कदाचिद् बहुतरगहनात्खण्डबिल्वीदलानि - किंवा कधीही अत्यंत गहन जंगलात जाऊन बिल्वपत्रे खुडून आणली नाहीत.

नानीता पद्ममाला सरसी विकसिता गन्धपुष्पै त्वदर्थं- हे भगवंता मी सरोवरामध्ये विकसित झालेली सुगंधाने युक्त अशी कमल फुलांची माला तुझ्याकरता कधी आणली नाही.

क्षन्तव्यो मे पराधः शिव शिव शिव भो श्रीमहादेव शम्भो - हे भगवान शंकरा! माझे अपराध क्षमा कर.

येथे आचार्यश्री आपल्याला भगवान शंकरांच्या पूजेसाठी निसर्गात सहज उपलब्ध असणाऱ्या गोष्टीदेखील किती पर्याप्त आहेत ते सांगत आहेत.

सदैव वाहणाऱ्या गंगेचे जल, सहज मिळणारी बिल्वपत्र, जलाशयात आपोआप येणारी कमलपुष्पे या गोष्टी निसर्गात परस्पर उपलब्ध आहेत. निदान त्या तर आपण सहज जाणू शकतो ना?



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## २०४) श्री शिवापराधक्षमापण स्तोत्रम् -६

दुग्धैर्मध्वाज्ययुक्तैर्दधिसितसहितैः स्नापितं नैव लिङ्गं
नो लिप्तं चन्दनाद्यैः कनकविरचितैः पूजितं न प्रसूनैः ।
धूपैः कर्पूरदीपैर्विविधरसयुतैर्नैव भक्ष्योपहारैः क्षन्तव्यो मे पराधः शिव शिव शिव भो श्रीमहादेव शम्भो ।।६।।

भगवान श्री शंकरांच्या पूजनाचा विषय निघाल्यानंतर या पूजेमध्ये अर्पण करण्याच्या पुढील पदार्थांची आचार्यश्री ना स्वाभाविक आठवण झाली. या उपचारांचा देखील मी कधी विनियोग केला नाही. अशी कबुली देत त्यासाठी क्षमा मागताना आचार्यश्री म्हणतात,

दुग्धैर्मध्वाज्ययुक्तैर्दधिसितसहितैः - दूध,मध, आज्य म्हणजे तूप यांनी युक्त असलेल्या दही आणि साखर सह, अर्थात पंचामृताने,

स्नापितं नैव लिङ्गं - मी कधीही शिवलिंगाला स्नान घातले नाही.

नो लिप्तं चन्दनाद्यैः- त्या भगवान शंकरांच्या प्रतीक शिवलिंगावर कधी चंदन इत्यादींचा लेप लावला नाही. कनकविरचितैः पूजितं न प्रसूनैः - कधी सोने इत्यादींनी सजविलेल्या फुलांनी, अर्थात फुले किंवा आभूषणांनी,

धूपैः- ऊद इ. धूपांनी, कर्पूरदीपै - कापूर आरती इत्यादींनी कधी भगवंता तुझी पूजा केली नाही.

र्विविधरसयुतैर्नैव भक्ष्योपहारैः - विविध रसांनी युक्त असणारे भक्ष इत्यादी नैवेद्य समर्पित केले नाही.

नैवेद्यात मधुर, आम्ल,लवण,कटू, कशाय आणि तिक्त हे

सहा रस असावेत आणि भक्ष्य म्हणजे खाता येणारे, लेह्य म्हणजे चाटता येणारे, पेय म्हणजे पिता येणारे आणि चोष्य म्हणजे चोखता येणारे अशा चार प्रकारचे अन्न असावे असे वर्णन आहे. क्षन्तव्यो मे पराधः शिव शिव शिव भो श्रीमहादेव शम्भो - हे श्री महादेव शंभो माझ्या या अपराधांना क्षमा करा.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

**२०५) श्री शिवापराधक्षमापणस्तोत्रम् -७**

नो शक्यं स्मार्तकर्म प्रतिपदगहनप्रत्यवायाकुलाख्यं
श्रौते वार्ता कथं मे द्विजकुलविहिते ब्रह्ममार्गानुसारे ।
तत्वऽज्ञाते विचारैः श्रवणमननयोः किं निदिध्यासितव्यं क्षन्तव्यो मे पराधः शिव शिव शिव भो श्रीमहादेव शम्भो ।।७।।

आपल्या ठिकाणी उपासनेशी संबंधित कोणतीही पात्रता नाही अशा स्वरूपात पूज्यपाद आचार्यश्री आपल्या अज्ञानाचे भगवंताच्या चरणाशी प्रदर्शन करीत आहेत.

वेगवेगळ्या शास्त्र ग्रंथात उपासनेचे नियम सांगितलेले असतात त्यांना श्रुती प्रतिपादित म्हणजे श्रौत तर स्मृती प्रतिपादित म्हणजे स्मार्त कर्म असे म्हणतात.

आचार्य श्री प्रथम चरणात म्हणतात,

नो शक्यं स्मार्तकर्म प्रतिपदगहनप्रत्यवायाकुलाख्यं - एखाद्या घरंदाज अर्थात परंपरेने युक्त असणाऱ्या पंडितालाच कळावे अशा प्रत्येक पदाच्या कठीण अर्थांनी भरलेल्या स्मार्त कर्माची मला शक्यता नाही. मला त्यांचा अर्थ कळत नाही.

श्रौते वार्ता कथं मे द्विजकुलविहिते ब्रह्ममार्गानुसारे - मग पंडितांच्या वंशपरंपरेत ब्रह्म मार्गानुसार केल्या जाणाऱ्या श्रौत कर्माची तर गोष्टच कुठे? तो तर आणखीन पलीकडचा मार्ग. आणखीनच कठीण.

तत्वऽज्ञाते विचारैः श्रवणमननयोः किं निदिध्यासितव्यं - खूप विचारपूर्वक अर्थात प्रयत्नपूर्वक जरी मी श्रवण मनन केले तरी मला त्या ग्रंथातील तत्त्व अज्ञातच राहते. मग श्रवण मननच शक्य नाही तर पुढील निदिध्यासन कसे जमणार? ते तर असंभव आहे.

श्रवण,मनन आणि निधिध्यासन अशी तीन स्तरीय रचना असते. श्रवण या शब्दाचा अर्थ श्रीगुरुंनी, ग्रंथांनी सांगितलेले यथायोग्य स्वरूपात ऐकणे. मनन शब्दाचा अर्थ आहे त्यावर शांतपणे विचार करून तो विचार सर्वार्थाने अंगीकारणे. तरी निधिध्यासन शब्दाचा अर्थ त्या विचारानुसार आचरण करणे. जर श्रवण मननच नीट झाले नाही तर आचरण होणारच कसे? अशी स्वतःची अगतिकता आचार्य येथे सादर करीत आहेत. वास्तविक ती आपली अवस्था आहे. आपल्याला ती सांगता सुद्धा येत नाही त्यामुळे आपल्या वतीने आचार्य सांगत आहेत.

क्षन्तव्यो मे पराधः शिव शिव शिव भो श्रीमहादेव शम्भो - हे भगवान महादेव शंभो शंकरा माझ्या या शास्त्र अज्ञानरूपी अपराधांना क्षमा करा.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

**२०६) श्री शिव क्षमापराधणस्तोत्रम्- ८**

ध्यात्वा चित्ते शिवाख्यं प्रचुरतरधनं नैव दत्तं द्विजेभ्यो
हव्यं ते लक्षसंख्यैर्हुतवहवदने नार्पितं बीजमन्त्रैः ।
नो तप्तं गाङ्गतीरे व्रतजपनियमैरुद्रजाप्यैर्न वेदैः
क्षन्तव्यो मे पराधः शिव शिव शिव भो श्रीमहादेव शम्भो ।।८।।

आपण सुरुवातीलाच पाहिल्याप्रमाणे मी काय काय केले नाही यांची सूची देण्याच्या निमित्ताने खरेतर आचार्यश्री आपण काय काय करायला पाहिजे ते सांगत आहेत.

त्या सूचीत ते पुढे म्हणतात,

ध्यात्वा चित्ते शिवाख्यं - मनामध्ये भगवान शंकरांचे नामस्मरण करीत करीत,

प्रचुरतरधनं नैव दत्तं द्विजेभ्यो - मी कधी ब्राह्मणांना भरपूर धन दिले नाही. अर्थात कधीही सत्पात्री दान केले नाही.

हव्यं ते लक्षसंख्यैर्हुतवहवदने नार्पितं बीजमन्त्रैः - मी कधीही बीज मंत्रांनी लाखोच्या संख्येत अग्नीमध्ये आहुत्या दिल्या नाहीत.

यात बीज मंत्र म्हणतांना सर्वात लहान संख्येचा मंत्र असा भाव आहेत. तोदेखील कधी केला नाही. अर्थात तो दहा वीस वेळा किंवा एखादी माळ करून उपयोग नाही हे सांगण्याकरता आचार्य श्री लाखोच्या संख्येचा विचार करतात. किंवा मी इतके भव्यदिव्य विधान केले नाही. असा देखील अर्थ.

नो तप्तं गाङ्गतीरे - मी कधीही गंगा नदीच्या तीरावर तप केले नाही. व्रतजपनियमैरुद्रजाप्यैर्न वेदैः - व्रत,जप इत्यादींची संबंधित नियमांचे पालन करून ना कधी रुद्र जप केला, ना कधी वेदांचा अभ्यास.

क्षन्तव्यो मे पराधः शिव शिव शिव भो श्रीमहादेव शम्भो - हे भगवान महादेव शंकरा ! यापैकी काहीही न करता आयुष्य वृत्ता घालवले या अपराधाकरिता मला क्षमा करा.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

**२०७) श्री शिवापराधक्षमापणस्तोत्रम्- ९**

नग्नो निःसङ्गशुद्धस्त्रिगुणविरहितो ध्वस्तमोहान्धकारो नासाग्रे न्यस्तदृष्टिर्विदितभवगुणो नैव दृष्टः कदाचित् ।

उन्मन्यावस्थया त्वां विगतकलिमलं शङ्करं न स्मरामि क्षन्तव्यो मे पराधः शिव शिव शिव भो श्रीमहादेव शम्भो ।।९।।

भगवान शंकरांच्या दिव्य वैभवाचे वर्णन करतांना आचार्य श्री येथे त्यांच्या काही विशेषणांचा उल्लेख करीत आहेत. ते म्हणतात,

नग्नो- ज्यांचे मायारूपी वस्त्र गळून गेले आहे, ज्यांच्यावर कशाचेच आवरण पडूच शकत नाही, त्यांना शास्त्रात नग्न असे म्हणतात. निःसङ्ग- ज्यांना कशाचाही संग अर्थात लेप लागत नाही.

शुद्ध- ज्यांच्या ठिकाणी मायेच्या मलीनतेचा अंश देखील नसतो त्यांना शुद्ध असे म्हणतात.

त्रिगुणविरहितो- मायेच्या सत्व, रज आणि तम या तीनही गुणांनी रहीत असलेले, निर्गुण निराकार. ध्वस्तमोहान्धकारो- ज्यांच्या ठिकाणी कुठल्याही स्वरूपाचा मोह शिल्लक उरलेला नाही असे.

नासाग्रे न्यस्तदृष्टिः - ज्यांनी आत्मध्यानासाठी नासिकाग्रावर दृष्टी स्थिर केली आहे असे,

विदितभवगुणो - अशा विविध गुणांनी युक्त असणाऱ्या,

नैव दृष्टः कदाचित् - आपल्या स्वरूपाचे मी कधीही दर्शन घेतले नाही.

उन्मन्यावस्थया - उन्मनी अवस्थेमध्ये,

त्वां विगतकलिमलं - कली अर्थात दोषांचा मळ नष्ट झालेल्या आपले,

शङ्करं न स्मरामि- हे भगवान शंकरा ! मी कधीच स्मरण केले नाही.

क्षन्तव्यो मे पराधः शिव शिव शिव भो श्रीमहादेव शम्भो - हे भगवान महादेव शंभो शंकरा माझ्या या सगळ्या अपराधां करिता मला क्षमा करा.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

**२०८) श्री शिवापराधक्षमापणस्तोत्रम्-१०**

स्थित्वा स्थाने सरोजे प्रणवमयमरुत्कुण्डले सूक्ष्ममार्गे
शान्ते स्वान्ते प्रलीने प्रकटितविभवे ज्योतिरूपे पराख्ये ।
लिङ्गज्ञे ब्रह्मवाक्ये सकलतनुगतं शङ्करं न स्मरामि
क्षन्तव्यो मे पराधः शिव शिव शिव भो श्रीमहादेव शम्भो ।।१०।।

येथे भगवान जगद्गुरु आदि शंकराचार्य स्वामी महाराज ध्यान मार्गाच्या अंतिम अवस्थेचे वर्णन करीत आहेत. ते म्हणतात,

स्थित्वा स्थाने सरोजे - ब्रह्मरंध्रामध्ये असणाऱ्या सहस्त्रदल कमला मध्ये स्थिर होऊन,

प्रणवमय - ओंकार ब्रह्मस्वरूप भगवान शंकरांचे ,

मरुत्कुण्डले - जेथे प्राणवायु प्राणशक्ती मध्ये विलीन होतो त्या कुंडामध्ये,

सूक्ष्ममार्गे- कुंडलिनीच्या सूक्ष्म मार्गाने प्रवास करून, तेथे निवास करणाऱ्या,

शान्ते - काहीही मिळवायचे नसल्याने परमशांत असलेले,

स्वान्ते- स्वतःच्याच स्वरूपात असणारे,

प्रलीने- आत्मरूपात लीन असणारे,

प्रकटितविभवे - बाहेर आपल्या संपूर्ण वैभवाला प्रकट करणारे,

ज्योतिरूपे - चैतन्यस्वरूप तेजस्वी,

पराख्ये- परमतत्व असणारे,

लिङ्गज्ञे - शिवलिंगाच्या माध्यमातून ज्यांचे ज्ञान घडते असे,

ब्रह्मवाक्ये - उपनिषदातील महा वाक्यांमध्ये ज्यांचे तत्त्ववर्णन केले आहे असे,

सकलतनुगतं- सर्व ईश्वर महेश्वर यांच्याद्वारे सेवा केली जात असणारी,

शङ्करं न स्मरामि - असे जे भगवान शंकर आहेत त्यांचे मी कधीही स्मरण देखील केले नाही.

क्षन्तव्यो मे पराधः शिव शिव शिव भो श्रीमहादेव शम्भो - हे भगवान महादेव शंभू शंकरा ! माझ्या या अपराधाकरिता मला क्षमा करा.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

**२०९) श्री शिवापराध क्षमापणस्तोत्रम् - ११**

हृद्यं वेदांतवेद्यं हृदयसरसिजे दीप्तमुद्यत्प्रकाशम् !
सत्यं शांतस्वरूपं सकलमुनिमन:पद्मषण्डैकवेद्यम् !!
जाग्रत्स्वप्नेसुषुप्तौ त्रिगुणविरहितं शङ्करं न स्मरामि !
क्षन्तव्यो मेऽपराध: शिव शिव शिव भो श्री महादेव शंभो !! ११!!

या स्तोत्राच्या अनेक आवृत्तीमध्ये प्रस्तुत श्लोक उपलब्ध नाही. मात्र कांची कामकोटि पीठाद्वारे प्रकाशित स्तोत्रावली मध्ये समाविष्ट असलेला हा अत्यंत सुंदर श्लोक.

जगद्गुरु आदि शंकराचार्य स्वामी महाराज म्हणतात,

हृद्यं - अत्यंत मनोहारी असणाऱ्या,

वेदांतवेद्यं - वेदांत सारखा उपनिषदांमध्ये प्रतिपादित तत्वज्ञानाच्या द्वारे ज्यांची जाणीव होते असे,

हृदयसरसिजे दीप्तमुद्यत्प्रकाशम् - ज्यांच्या कृपा स्वरूपात हृदय कमला मध्ये भक्तीची दिव्य ज्योत प्रज्वलित होते असे,

सत्यं - भूत, भविष्य वर्तमान या तीनही काळांच्या अतीत असणारे, परम सत्य, शांतस्वरूपं- काहीच मिळवायचे नसल्याने परमशांत असणारे, सकलमुनिमन:पद्मषण्डैकवेद्यम् - सगळ्या ऋषीमुनींच्या हृदय कमलरुपी समर्पणानेच जाळता येणारे,

जाग्रत्स्वप्नेसुषुप्तौ- जागृती, स्वप्न व सुषुप्ति म्हणजे गाढ निद्रा या माझ्या तीनही अवस्थांमध्ये,

त्रिगुणविरहितं - तीनही गुणांनी रहित असणाऱ्या,

शङ्करं न स्मरामि - भगवान शंकरांचे मी कधीही स्मरण केले नाही.

येथे आचार्यश्री सांगत आहेत की जीव हा तीन अवस्थांमध्ये सारखा तीन गुणांनी युक्त आहे. तर भगवान त्रिगुणातीत आहे. तीन गुणांमुळे प्राप्त होणाऱ्या सकल समस्यांच्या निराकरणासाठी स्थान एकच त्रिगुणातीत भगवान शंकरांची चरणकमले.

पण जीव त्यांचे स्मरण करीत नाही. क्षन्तव्यो मेऽपराध: शिव शिव शिव भो श्री महादेव शंभो - हे भगवान महादेव शंभो शंकरा माझ्या या अपराधा करित मला क्षमा करा.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## २१०) श्री शिवापराधक्षमापणस्तोत्रम् -१२

चन्द्रोदभासितशेखरे स्मरहरे गङ्गाधरे शंकरे
सर्पैभूषितकण्ठकर्णविवरे नेत्रोत्थवैश्वानरे ।
दन्तित्वक्कृतसुन्दराम्बरधरे त्रैलोक्यसारे हरे मोक्षार्थ कुरु
चित्तवृत्तिमखिलामन्यैस्तु किं कर्मभिः ।।१२।।

भगवान शंकरांच्या दिव्य वैभवाला आपल्या समोर ठेवताना जगद्गुरु आदि शंकराचार्य स्वामी महाराज शब्दरचना करतात,

चन्द्रोदभासितशेखरे - मस्तकावरील चंद्रामुळे ज्यांचा शिरोप्रदेश उजळून निघाला आहे असे. मस्तकावरील चंद्र हे वेगळ्या अर्थाने मस्तकाच्या उज्ज्वलतेचे, शांततेचे, प्रसन्नतेचे, शीतलतेचे प्रतीक.

स्मरहरे - स्मर म्हणजे भगवान मदन. श्रीशंकरांनी मतदानाचे दहन केल्यामुळे त्यांना स्मरहर म्हटले आहे.

गङ्गाधरे - मस्तकावर गंगा धारण करून संपूर्ण जगाच्या पावनतेची धुरा ज्यांनी आपल्या मस्तकावर घेतली आहे असे,

शंकरे - शम् म्हणजे कल्याण. संपूर्ण विश्वाचे कल्याण करतात ते भगवान शंकर. सर्पैभूषितकण्ठकर्णविवरे - ज्यांनी गळ्यात मोत्यांच्या माळांप्रमाणे आणि कानात कुंडलां प्रमाणे सर्प धारण केले आहेत असे. नेत्रोत्थवैश्वानरे - ज्यांच्या तृतीय नेत्रातून विश्व विनाशकारी प्रलयाग्नी प्रगट होतो असे,

दन्तित्वक्कृतसुन्दराम्बरधरे - दंती म्हणजे हत्ती. त्याची त्वचा म्हणजे कातडे ज्यांनी वस्त्र प्रमाणे गुंडाळले आहे असे. गजासुर नावाच्या राक्षसाला सोबत झालेल्या संग्रामाचा इथे संदर्भ आहे.

त्रैलोक्यसारे- संपूर्ण त्रैलोक्याचे सार असणाऱ्या,

हरे- भक्तांची दुःखे दूर करणाऱ्या,

मोक्षार्थ कुरु चित्तवृत्तिमखिलामन्यैस्तु किं कर्मभिः - हे भगवान शंकरा ! माझ्या मोक्षासाठी कारणीभूत ठरणारी माझी वृत्ती निर्मल करा. अन्य स्तवनाचा अर्थात मागणीचा उद्देश तो काय?



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

**२११) श्री शिवापराधक्षमापणस्तोत्रम्- १३**

किं यानेन धनेन वाजिकरिभिः प्राप्तेन राज्येन किं
किं वा पुत्रकलत्रमित्रपशुभिर्देहेन गेहेन किम् ।
ज्ञात्वैतत्क्षणभंगुरं सपदि रे त्याज्यं मनो दूरतः
स्वात्मार्थ गुरुवाक्यतो भज भज श्रीपार्वतीवल्लभम् ।।१२।।

आयुष्यामध्ये मिळणाऱ्या सगळ्या गोष्टींपेक्षा भगवान श्री शंकराची कृपा हीच खरी प्राप्ती आहे हे सांगण्यासाठी आचार्यश्री म्हणतात,

किं यानेन - प्रवासाची सुखकारक साधने असून काय?

धनेन - प्रचुर स्वरूपात धन असून काय?

वाजिकरिभिः

प्राप्तेन राज्येन किं - सगळ्या जगावर आपली सत्ता चालेल असे राज्य मिळून देखील काय?

या सगळ्यामध्ये काय? या शब्दाच्या पुढे, उपयोग जी हा शब्द गृहीत आहे.

या सगळ्याच्या प्राप्तीने सुख मिळेल असे माणसाला वाटते. काही काळा पुरते ते सुख मिळते देखील. पण ते टिकाऊ असत नाही. अशा नश्वर सुखाच्या मागे लागणारे लोक, आणखी कशा कशाचा हव्यास करतात? ते सांगताना आचार्य म्हणतात,

किं वा पुत्रकलत्रमित्रपशुभिः - पुत्र संतती, कलत्र म्हणजे पत्नी, मित्र, पशुपक्षी, नवीन संदर्भात लावायचे तर वाहन सौख्य,

देहेन - इतकेच काय तर या सगळ्यांच्या द्वारे मिळणाऱ्या सुखाचा आधार असणारा देह.

गेहेन किम् - विशाल घराचे काय?

ज्ञात्वैतत्क्षणभंगुरं - या सगळ्यांचे क्षणभंगुरतत्व समजून घेऊन,

सपदि रे त्याज्यं मनो दूरतः - हे मना ! या सगळ्यांची आसक्ती दुरूनच, तत्काळ सोडून दे.

स्वात्मार्थ गुरुवाक्यतो भज भज श्रीपार्वतीवल्लभम् - जर तुला स्वतःचे खरंच कल्याण करायचे असेल! तर श्रीगुरूंचा सांगण्यानुसार भगवान पार्वतीवल्लभाचे भजन कर.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

**२१२) श्री शिवापराधक्षमापण स्तोत्रम् -१४**

पौरोहित्यं रजनीचरितं ग्रामणीत्वं नियोगो
माठापत्यं ह्यनृतवचनं साक्षिवाद: परान्नम् !
ब्रह्मद्वेष: खलजनरती प्राणिनां निर्दयत्वं
मा भूदेवं मम पशुपते जन्मजन्मांतरेषु !!१४!!

जगणे आणि जिवंत असणे या दोन मध्ये फरक आहे. केवळ श्वास घेणे म्हणजे जगणे नव्हे. उदरभरण तर पशु पक्षांचे देखील चालतेच. मात्र त्यासाठी खालील गोष्टी करण्याची माझ्यावर वेळ येऊ नये. ही आचार्यश्रींची मागणी अनेक अर्थाने चिंतनीय आहे.

पौरोहित्यं - पोट भरण्याचा पुरता धर्माचा उपयोग, त्यात समोरच्या यजमानाला बरे वाटेल म्हणून अशास्त्रीय गोष्टी अनेकदा केल्या जातात त्याचा संदर्भ आहे.

रजनीचरितं- रात्री केली जाणारी गोष्ट. म्हणजे चोरी. कोणत्याही प्रकारचे पाप.

ग्रामणीत्वं - गावचे प्रधानत्व. कारण त्यात दोन्हीकडून त्याच्यावरच दबाव असतो. इतरांच्या समस्यांनी आपली शांती नष्ट होते.

नियोगो - कोणाच्या हाताखाली नोकरी करणे. त्यात परावलंबित्वाचे दुःख आहे.

माठापत्यं - मठाचा लौकिक कारभार सांभाळण्याची वेळ. वेगळ्या मार्गाने पुन्हा व्यावहारिक गोष्टीच येतात.

ह्यनृतवचनं - खोटे बोलण्याची लाजिरवाणी अडचण.

साक्षिवाद:- इतरांच्या भांडणामध्ये साक्ष देण्याची वेळ.

परान्नम् - दुसऱ्याच्या अन्नावर जगण्याची नामुष्की.

ब्रह्मद्वेष: - ब्राह्मणांचा अर्थात पंडित, विद्वानांचा, सज्जनांचा द्वेष.

खलजनरती - खल अर्थात विकृत मानसिकतेच्या लोकांवरील प्रेम.

प्राणिनां निर्दयत्वं - जीवमात्रांच्या प्रती निर्दयता.

मा भूदेवं मम पशुपते जन्मजन्मांतरेषु - हे भगवान महादेव पशुपती शंकरा ! या दुर्दैवी गोष्टी करण्याची वेळ माझ्यावर जन्मजन्मांतरीही कधी येऊ नये.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

**२१४) श्री शिवापराधक्षमापणस्तोत्रम् -१६**

करचरणकृतं वाककायजं कर्मजं वा श्रवणनयनजं वा मानसं वापराधम् ।

विहितमविहितं वा सर्वमेतत्क्षमस्व जय जय करुणाब्धे श्रीमहादेव शम्भो ।।१६।।

स्तोत्राच्या शेवटी मी जे काही करतो, अर्थात या देह मन बुद्धी च्या द्वारे जे जे काही घडते, त्या सगळ्यांच्या मध्ये माझ्या अज्ञानामुळे ज्या ज्या चुका होतात, त्या सगळ्यां करिता आचार्यश्री एकत्र क्षमायाचना करीत आहेत. ते म्हणतात,

करचरणकृतं - हात किंवा पाय अर्थात कर्मेंद्रिये यांच्याद्वारे मी जे काही केले,

वाक - वाणीच्या द्वारे मी जे काही बोललो, विचार व्यक्त केले.

कायजं - शरीराच्या द्वारे अगदी सहज घडणारी क्रिया पापणी लवविण्यापासून मुद्दाम ठरवून केलेल्या प्रत्येक क्रियेपर्यंत जे काही केले.

कर्मजं वा - माझी जी काही ही शारीरिक मानसिक बौद्धिक कर्म होती.

श्रवणनयनजं वा - कानांनी ऐकणे किंवा डोळ्यांनी पाहणे या द्वारी देखील जिकली केले.

मानसं वापराधम् - किंवा मानसिक स्वरूपात जे अपराध केले.

ते केवळ मनाच्या पातळीवर असल्याने इतर कोणाला दिसले नसली तरी हे अंतर्यामी परमेश्वरा तुला अगम्य काय आहे?

विहितमविहितं वा- मी जी काही शास्त्र विहित किंवा अविहित कर्मे केली.

या सगळ्यांच्या मध्ये माझ्याद्वारे ज्या काही चुका झाल्या आहेत. अपराध घडलेले आहेत,

सर्वमेतत्क्षमस्व जय जय करुणाब्धे श्रीमहादेव शम्भो - हे करुणासागर भगवान महादेव शंकरा ! मी आपला जयजयकार करतो. या सर्व गोष्टींसाठी मला क्षमा करा.

अशा रीतीने आचार्यश्री विविध कारणांकरिता भगवान श्री शंकरांच्या चरणी क्षमायाचना करीत असल्याने या स्तोत्राला श्री शिवापराधक्षमापणस्तोत्रम् असे संबोधिले जाते.

ॐ नमः शिवाय !